**भारतीय नागरिक सुरक्षा संहिता २०२३ च्या कलम ३७ च्या अंमलबजावणीचे अधिकार पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना प्रत्यार्पित करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ०७२४/प्र.क्र. ३८०/पोल-५ब**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक :- १ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-** भारतीय नागरिक सुरक्षा संहिता अधिनियम, २०२३ मधील कलम ३७

**प्रस्तावना :-**

भारतीय संसदेने भारतीय न्याय संहिता-२०२३, भारतीय नागरिक सुरक्षा संहिता-२०२३ व भारतीय साक्ष अधिनियम-२०२३ हे तीन अधिनियम पारित केले आहेत. सदर नवीन कायद्यांची अंमलबजावणी दि. ०१.०७.२०२४ पासून करण्यात आली आहे.

भारतीय नागरिक सुरक्षा संहिता २०२३ कलम ३७ मधील तरतुदी पुढीलप्रमाणे :-

| | |
|---|---|
| पदनिर्देशित पोलीस अधिकारी | ३७. राज्य शासन- |
| | (क) प्रत्येक जिल्ह्यामध्ये व राज्य स्तरावर, पोलीस नियंत्रण कक्ष स्थापन करील; |
| | (ख) सहायक पोलीस उपनिरीक्षकाच्या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या पोलीस अधिकाऱ्यास, प्रत्येक जिल्ह्यामध्ये व प्रत्येक पोलीस ठाण्यामध्ये आणि पोलीस उपनिरीक्षकाच्या दर्जापेक्षा कमी नसलेल्या पोलीस अधिकारी यांस प्रत्येक जिल्ह्यामध्ये (जिल्हा नियंत्रण कक्ष) पदनिर्देशित करील, असा पोलीस अधिकारी, अटक केलेल्या व्यक्तींची नावे व पत्ते, दोषारोप असलेल्या अपराधाचे स्वरुप याबद्दलची माहिती ठेवण्यासाठी जबाबदार असेल, अशी माहिती, प्रत्येक पोलीस ठाण्यामध्ये व जिल्हा मुख्यालयांच्या ठिकाणी, डिजिटल माध्यमांसह कोणत्याही रीतीने ठळकपणे प्रदर्शित करण्यात येईल. |

त्यानुषंगाने भारतीय नागरिक सुरक्षा संहिता, २०२३ च्या कलम ३७ च्या अंमजबजावणीचे राज्य शासनाचे अधिकार पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना प्रत्यार्पित करण्याबाबत शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-** भारतीय संसदेने पारित केलेल्या भारतीय नागरिक सुरक्षा संहिता-२०२३ या अधिनियमांतर्गत कलम ३७(ख) खाली निहित अधिकार पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना या शासन निर्णयाद्वारे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०११४३२५०९९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

VENKATESH MADHAV BHAT

Digitally signed by VENKATESH MADHAV BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH MADHAV BHAT
Date: 2024.08.01 15:59:01 +05'30'

**( व्यंकटेश भट )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (राज्य उत्पादन शुल्क) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. मा. अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई.
६. मा. प्रधान सचिव (अ.व सु.), मंत्रालय, मुंबई.
७. मा. प्रधान सचिव (गृह)( विशेष), मंत्रालय, मुंबई
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
१०. उप सचिव, विशा-९, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती, गृह विभाग-पोल-५ब.